सेवा विषयक बाबींसंबंधीची प्रकरणे.

मा. मुख्यमंत्र्यांना सादर करणे आणि सामान्य प्रशासन विभागास दाखविणे आवश्यक असणा-या प्रकरणांची यादी.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक- एसआरव्ही-१०९०/प्र.क्र. १/९०/१२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : १३ नोव्हेंबर, १९९२.

वाचा :- १] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०७५/१०, दिनांक : २४ जुलै, १९७५.
२] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०७५/१०, दिनांक १२ डिसेंबर, १९७५.
३] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०७८/१०, दिनांक १३ नोव्हेंबर, १९७८.
४] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०९०/ प्र.क्र. १/९०/१२, दिनांक १० मे, १९९०.
५] शासन परिपत्रक क्रमांक-एसआरव्ही-१०९०/प्र.क्र. १/९०/१२, दिनांक २९ एप्रिल, १९९२.

परिपत्रक :-

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०९०/प्र.क्र. १/ ९०/१२, दिनांक २९ एप्रिल, १९९२ अन्वये शासन सेवेतील सेवकांच्या सेवाविषयक बाबींसंबंधीची कोणती प्रकरणे मा. मुख्यमंत्र्यांना सादर करणे आवश्यक आहे, कोणती प्रकरणे सामान्य प्रशासन विभागास दाखविणे आवश्यक आहे व कोणती प्रकरणे दाखविणे आवश्यक नाही, याबाबतच्या वर उल्लेखिलेल्या दिनांक २४ जुलै, १९७५ च्या आदेशांमधील बाब क्र. १ व ५ मध्ये सुधारणा करण्यात आल्या आहेत. विवरणपत्रामधील बाब क्र. १ मध्ये पुढील प्रमाणे आणखी सुधारणा करण्यात यावी, असे शासनाचे आदेश आहेत -

"मात्र विद्यापीठ अनुदान आयोगाच्या शिफारशीनुसार रु. ३,७००/- ५,७००/-या वेतनश्रेणीत जी अध्यापकीय पदे आहेत अशा श्रेणीतील अधिका-यांची नियतकालिक बदली, पदस्थापना यासंबंधीचा प्रस्ताव

मा. मुख्यमंत्र्यांना सादर करणे आवश्यक नाही. अशा प्रकरणी संबंधित विभागाचे प्रभारी मंत्री निर्णय घेण्यास सक्षम राहतील."

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ य. मा. जोशी ]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
शासनाचे सर्व सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग.